**महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान**
**अमरावती शहरातील राजापेठ उड्डाणपूल प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बैठक-२०१७/प्र.क्र.२२९/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ११ मे, २०१७

**वाचा:-**

१. शासन निर्णय क्र: नगरो २०१४/प्र. क्र.११९/नवि३३, दिनांक २१ ऑगस्ट, २०१४.
२. शासन निर्णय क्र.नगरो-२०१५/प्र.क्र.६४/नवि-३३, दिनांक २७ मे, २०१६.
३. दिनांक ०८.०५.२०१७ रोजी झालेल्या महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाखालील प्रकल्प मान्यता व सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :-**

राज्यातील नागरी भागात मुलभूत पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी व त्यांचा दर्जा वाढविण्याकरिता शासन निर्णय क्र. एनयुआर-२००८/प्र.क्र.२०३/नवि-३३, दि. २०.०२.२०१० च्या तरतुदीच्या अधीन राहून महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान योजना राबविण्यात येत होती. तथापि संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये, सदरहू दि. २०.०२.२०१० चा शासन निर्णय अधिक्रमित करून, महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाच्या वित्तीय आकृतीबंधात व व्याप्तीमध्ये सुधारणा करण्यात आली आहे. त्या अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयाच्या तरतुदीन्वये महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान राबविण्यात येत आहे.

**०२.** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान अभियानांतर्गत अमरावती शहरातील राजापेठ उड्डाणपूल प्रकल्पाचा प्रकल्प प्रस्ताव राज्यस्तरीय मान्यता समितीकडे मान्यतेकरीता सादर करण्यात आला होता. या प्रस्तावास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती यांनी दिनांक ०८.०५.२०१७ रोजीच्या पत्रान्वये तांत्रिक मान्यता दिलेली आहे. त्याअनुषंगाने राज्यस्तरीय मान्यता समितीने दि. ०८.०५.२०१७ रोजी झालेल्या राज्यस्तरीय प्रकल्प मान्यता समितीच्या बैठकीमध्ये शासन मान्यतेच्या अधीन राहून तसेच इतर अटीबरोबर सदर प्रकल्पास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियाना अंतर्गत सादर करण्यात आलेल्या अमरावती शहरातील राजापेठ रेल्वे उड्डाणपूल या प्रकल्पास संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतुदीच्या

अधीन राहून खालील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी दिलेली तांत्रिक मान्यता व त्यानुसार आयुक्त, अमरावती महानगरपालिका यांनी प्रमाणित केलेनुसार अमरावती शहरातील राजापेठ रेल्वे उड्डाणपूल प्रकल्पातील उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

| अ. क्र. | उपांगाचे नांव | अंदाजित रक्कम (रुपये) सन २०१५-१६ च्या दरसूची नुसार |
|---|---|---|
| 1 | Amount of via duct Non Railway Portion | 23,56,34,168 |
| 2 | Amount of Flyover Approaches (Ramp Portion) | 5,03,80,991 |
| 3 | Amount of Slip Road | 4,51,35,227 |
| 4 | Amount of Staircase | 17,08,421 |
| 5 | Amount of Electrical Works | 1,63,91,766 |
| | **GROSS COST** | 34,92,50,573 |
| | **SAY Rs.** | **34.9251 Crore** |
| | **प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी** | **कार्यादेश दिल्यापासून २४ महिने** |

**०२.** सदर प्रकल्पासाठी उपरोक्त प्रमाणे किंमतीस म्हणजेच रु.३४.९२५१ कोटी किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तथापि सदर प्रकल्पासाठी (अ) रेल्वे प्रशासनाकडून रु.८.६० कोटी इतका निधी उपलब्ध होणार आहे. तसेच, (ब) रु.१०.०० कोटी इतका निधी महानगरपालिका पायाभूत सुविधा योजनेतून उपलब्ध करून दिलेला आहे. त्याअनुषंगाने उर्वरीत प्रकल्प किंमतीच्या (रु. ३४.९२५१ कोटी - रु. ८.६० कोटी - रु. १० कोटी = १६.३२५१ कोटी) अनुषंगाने अमरावती राजापेठ रेल्वे उड्डाणपूल प्रकल्पासाठी योजनेचा वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे राहील.

| अ. क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव व वर्ग | योजनेची मंजूर किंमत | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ७० %) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या ३०%) |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| १ | अमरावती महानगरपालिका "ड" वर्ग | रु. १६.३२५१ कोटी | रु. ११.४२७६ कोटी | रु. ४.८९७५ कोटी |

**०३. संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार अमरावती शहरातील राजापेठ रेल्वे उड्डाणपूल प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे:-**

३.१ सदर प्रकल्पाचे कार्यान्वयन अमरावती महानगरपालिकेमार्फत करणेत यावे.

३.२ अमरावती महानगरपालिकेने राज्यस्तरीय मान्यता समितीने प्रकल्पास मंजुरी देताना विहित केलेल्या तसेच या शासन निर्णयाच्या प्रस्तावनेतील परिच्छेद २मध्ये नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता करणे बंधनकारक राहील.

३.३ महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानाच्या शासन निर्णयानुसार नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना खाली दर्शविलेल्या बंधनकारक व वैकल्पीक सुधारणा (रिफॉर्म) पूर्ण करणे आवश्यक राहिल. त्यापैकी ८० टक्के वैकल्पिक अटींची पूर्तता प्रकल्पाच्या दुसऱ्या वर्षापर्यंत करणे आवश्यक राहील.

I) **<u>बंधनकारक सुधारणा:-</u>**

१. सदरची योजना २४ महिन्यात पूर्ण करणेची जबाबदारी महानगरपालिकेची राहील.
२. दिनांक ३१ मे, २०१७ पूर्वी अमरावती शहर १००% हागणदारीमुक्त करण्याची जबाबदारी संबंधीत नागरी स्थानिक संस्थेची राहील.
३. प्रकल्प मंजुरीच्या पहिल्या वर्षात नगरपरिषद/नगरपरिषदा/नगरपंचायती यांच्या कामकाजाचे पूर्ण संगणकीकरण करणे अनिवार्य राहील. यात प्रामुख्याने ई-गव्हर्नन्स, लेखा, जन्म-मृत्यु नोंद सुधारणा याची १०० टक्के अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील.
४. उचित उपभोक्ता कर लागू करुन किमान ८० टक्के वसुली करणे.
५. नागरी क्षेत्रातील गरिबांसाठी अर्थसंकल्पात विवक्षित निधीची तरतूद करणे.
६. संबंधित स्थानिक नागरी स्वराज्य संस्थेने, द्विलेखा नोंद पद्धती सहा महिन्यात पूर्ण करणे आवश्यक राहिल.
७. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या क्षेत्रातील मालमत्ता कराचे पुर्नमुल्यांकन झाले नसल्यास, प्रकल्प मंजूरीपासून पुढील एक वर्षाच्या कालावधीत ते पूर्ण करणे बंधनकारक राहिल.
८. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने "घनकचरा व्यवस्थापन नियम २०१६" च्या तरतूदीनुसार त्यांच्या कार्यक्षेत्रातील घनकचरा व्यवस्थापन उचित रित्या करणे बंधनकारक राहील.
९. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने त्यांच्या कार्यक्षेत्रातील मालमत्ता कराची व पाणीपट्टीची वसुली पहिल्या वर्षी किमान ८० टक्के करणे बंधनकारक राहील. त्यापुढील वर्षात सदरहू वसूली उर्वरीत ९० टक्के या प्रमाणात करणे आवश्यक राहील.

II) **<u>वैकल्पिक सुधारणा:-</u>**

१. मलनिस्सारण प्रकल्प हाती घेतलेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी नागरी भागातील सांडपाण्याचे पुर्नप्रक्रिया व पुर्नवापर करण्याबाबतच्या घटकांचा समावेश त्यांच्या सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये करावा.

२. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांच्या मालकीच्या इमारतीवर पर्जन्यजलसंचय करावे.

३. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने नियमितपणे जल लेखापरिक्षण (वॉटर ऑडीट) करुन घ्यावे.जललेखापरिक्षण अहवालात नमूद त्रूटींचे निराकरण करण्याबाबत संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने, त्यासंदर्भात आवश्यक कृती कार्यक्रम तयार करुन विहित कालावधीत त्रूटींची पूर्तता करणे आवश्यक राहील.

**३.४** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील मंजूर प्रकल्पांसाठी यापुढे राज्य शासनाचा अनुज्ञेय हिस्सा तीन हप्त्यात (प्रत्येकी ३३.३३ टक्के) वितरीत करण्यात येईल. सदर प्रकल्पासाठी आवश्यक स्वहिश्याचा निधी रु. ४.८९७५ कोटी निधी १४ व्या वित्त आयोगाच्या निधीमधून अमृत अभियानांतर्गत अमरावती शहराच्या मलनिस्सारण प्रकल्पासाठी दि. २१.०१.२०१७ च्या शासन निर्णयान्वये वळती केलेल्या रु. १२.३५३ कोटी निधीतून वापरण्यास महानगरपालिकेस मुभा देण्यात येत आहे. सदर निधी या प्रकल्पाच्या बँक खात्यामध्ये वळती केल्यानंतर प्रकल्पासाठी पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

**३.५** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियान अंतर्गत मंजूर प्रकल्पास निधी वितरीत केल्यानंतर तो हप्ता व स्थानिक स्वराज्य संस्थेचा त्याप्रमाणातील स्वहिस्सा हा एकत्र निधी हा शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहित केलेल्या बॅकांमध्ये उघडून ठेवणे अनिवार्य राहील. या अभियानांत मंजूर प्रकल्पास पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत केल्यानंतर एक महिन्याच्या कालावधीत निविदा काढणे व तीन महिन्याच्या कालावधीत कार्यादेश देणे व १०१ व्या दिवशी कामाचा प्रत्यक्ष प्रारंभ करणे बंधनकारक राहील, न झाल्यास संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेस अशा प्रकल्पासाठी मंजूर केलेला निधी त्यावरील व्याजासह शासनास परत करणे आवश्यक राहील.

**३.६** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील मंजूर प्रकल्पांसाठी राज्य शासनाने मंजूर केलेला निधी व त्यावर मिळालेले व्याज फक्त त्याच प्रकल्पासाठी वापरता येईल व ते अन्य कोणत्याही कामासाठी वळवता किंवा वापरता येणार नाही . अशाप्रकारे मुळ निधी किंवा त्यावरील व्याज कायम स्वरुपी किंवा तात्पुरत्या स्वरुपात अन्यत्र वळविणे ही गंभीर स्वरुपाची आर्थिक अनियमितता मानली जाईल ,त्यासाठी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था/संबंधित अधिकारी कारवाईस पात्र ठरतील.

**३.७** महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील प्रकल्प त्या प्रकल्पास पहिल्या हप्त्याच्या निधी वितरणाच्या आदेशात नमूद केलेल्या कालावधीत पूर्ण करणे बंधनकारक राहील असे प्रकल्प कालमर्यादेत पूर्ण होतील याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, अमरावती महानगरपालिका यांची राहील.

३.८ महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील प्रकल्पाच्या सर्व उपांगांसाठी एकत्रित निविदा प्रक्रिया पूर्ण करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत कामाचे तुकडे पाडून निविदा काढण्यात येऊ नये. या सूचनेचे उल्लंघन केल्यास ती गंभीर अनियमितता मानली जाईल. निविदा प्रक्रिया पूर्ण केल्यानंतर कार्यादेश उपांगनिहाय देण्यात येतील.

३.९ महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानामधील प्रकल्पाच्या मंजूरीपासून प्रकल्प पूर्ण होईपर्यंत करावयाच्या कार्यवाहीचा कालबद्ध कार्यक्रम निश्चित करून प्रकल्प विहित कालावधीमध्ये पूर्ण करणेबाबतचे नियोजन करण्यात यावे.

**३.१० त्यानुसार विहित केलेल्या कालमर्यादेनुसार निधी वितरीत झाल्यापासून तीन महिन्यात निविदा अंतिम करून कार्यादेश देण्यात संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था अपयशी ठरल्यास अशा कामासाठी कार्यान्वयन यंत्रणा म्हणून अन्य यंत्रणेची (सार्वजनिक बांधकाम विभाग) यांना नियुक्त करण्याचा अधिकार शासनास राहील. त्यावेळी संबंधित स्थानिक स्वराज संस्थेचा हिस्सा मात्र त्यांनाच भरावा लागेल.**

३.११ या अभियांनांतर्गत हाती घेण्यात येणाऱ्या प्रकल्पाचे **शाश्वत फलित** (Permanent Outcome) निश्चित करण्यात यावे व प्रकल्प पूर्ण होताना साध्य फलिताचा आढावा घेण्यात यावा.

**३.१२ प्रकल्पांचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण:-**

"महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांचे, अंमलबजावणीच्या विविध टप्प्यावर वेळोवेळी शासकीय/निमशासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयाकडून "त्रयस्थ तांत्रिक परिक्षण" (थर्ड पार्टी टेक्नीकल ऑडीट) संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने, स्वनिधीतून करुन घेणे बंधनकारक राहिल. तसेच प्रकल्पांतर्गत पुढील हप्ता मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना सदर "त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाचे" गुणवत्तेबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. तद्नंतरच दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत केला जाईल.

**३.१३ प्रकल्पासंबंधी करारनामा:-**

"महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांच्या अनुषंगाने राज्यस्तरीय नोडल यंत्रणा व संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था यांचा द्विपक्षीय सामंजस्य करार करणे बंधनकारक राहील. सदर द्विपक्षीय सामंजस्य करारनामा तयार करून घेण्याची जबाबदारी नोडल यंत्रणेची राहील.

**३.१४ "महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्पांची देखभाल व दुरूस्ती:-**

"महाराष्ट्र सुवर्ण जयंती नगरोत्थान महाभियानातंर्गत" मंजूर प्रकल्प पूर्णत्वास गेल्यानंतर सदर योजनेची देखभाल व दुरूस्ती करण्याची जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. योजनेच्या देखभाल व दुरूस्तीसाठी कोणताही निधी शासनाकडून प्राप्त होणार नाही.

**३.१५** राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

**३.१६** संदर्भाधीन क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयातील तरतुदी तसेच सर्व अटी व शर्तीची पूर्तता करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेवर बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५१११६१२३९८०२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2017.05.12 19:28:10 +05'30'

**( पां.जो.जाधव )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, नगरविकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती विभाग, अमरावती
९. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
१०. जिल्हाधिकारी, अमरावती.
११. जिल्हा प्रशासन अधिकारी, अमरावती.
१२. आयुक्त, अमरावती महानगरपालिका, अमरावती.
१३. निवडनस्ती, नवि-३३.